**यंत्रमाग सहकारी संस्थांना अर्थसहाय्य करण्याच्या राज्याच्या योजनेंतर्गत मेट्रो हायटेक को ऑप टेक्सटाईल पार्क लि., (गारमेंट मॅन्युफॅक्चरींग), इचलकरंजी, ता. हातकणंगले, जि. कोल्हापूर या यंत्रमाग सहकारी संस्थेस दुसऱ्या हप्त्यापोटी (अंतिम हप्ता) शासकीय कर्ज वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र. यंत्रमाग २०२५ /प्र.क्र. ४०/टेक्स-२**
१६ वा मजला, नवीन प्रशासकीय भवन,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २९ मार्च, २०२५.

**वाचा :-** १) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्र.यंत्रमाग १३०६/प्र.क्र.१४१/टेक्स २ दिनांक २२ जानेवारी २००९.
२) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्र.यंत्रमाग २००९/प्र.क्र. ६१/टेक्स २ दिनांक ३१ मार्च, २०१७
३) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्र.यंत्रमाग २००९/प्र.क्र. ६१/भाग-१/टेक्स २ दिनांक ३० मार्च, २०२१
४) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांक:- यंत्रमाग- २०१७/प्र.क्र. ६०/ टेक्स- २, दिनांक २६ ऑगस्ट २०२४.

**प्रस्तावना :-**

राज्यातील यंत्रमाग सहकारी संस्थांना अर्थसहाय्य करण्याची वाचा क्र. १ च्या शासन निर्णयान्वये सुरु करण्यात आलेली राष्ट्रीय सहकारी विकास निगम पुरस्कृत योजना बंद करुन सदर संस्थाना राज्यशासनाकडून अर्थसहाय्य देण्याबाबतची नवीन योजना उपरोक्त वाचा क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये सुरु करण्यात आली. सदर योजना राष्ट्रीय सहकारी विकास निगमने यापूर्वी मंजूरी दिलेल्या २६ तसेच शासनास मंजूरीस्तव प्राप्त झालेल्या ६७ व २००९ पूर्वी मंजूरीप्राप्त एका प्रस्तावासाठी रु. ५२ लक्ष इतके अर्थसहाय्य राज्यशासनाकडून वितरीत करणे अशा एकूण ९४ संस्थापुरतीच मर्यादीत आहे.

राष्ट्रीय सहकारी विकास निगमने यापूर्वी मंजूरी दिलेल्या २६ संस्थांमध्ये मेट्रो हायटेक को ऑप टेक्सटाईल पार्क लि., (गारमेंट मॅन्युफॅक्चरींग), इचलकरंजी, ता. हातकणंगले, जि. कोल्हापूर या संस्थेचा समावेश आहे.

मेट्रो हायटेक को ऑप टेक्सटाईल पार्क लि., (गारमेंट मॅन्युफॅक्चरींग), इचलकरंजी, ता. हातकणंगले, जि. कोल्हापूर या संस्थेच्या गारमेंट मॅन्युफॅक्चरींग प्रकल्पासाठी रु. २७७०.०० लक्ष (अक्षरी रुपये दोन हजार सातशे सत्तर लक्ष फक्त) इतक्या खर्चाच्या प्रकल्पास राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांनी दिनांक १ एप्रिल, २०१४ च्या पत्रान्वये मंजूरी दिलेली आहे. त्यानुसार राज्य शासनाने सदर संस्थेस खालील प्रमाणे भागभांडवल व कर्ज वितरीत केले आहे.

राज्य शासनाने यापूर्वी सदर संस्थेला वाचा क्र. २ च्या शासन निर्णयान्वये प्रकल्प उभारणीसाठी अर्थसहाय्याच्या पहिल्या हप्त्यापोटी शासकीय भागभांडवल ५० % प्रमाणे रु. ५५४.०० लक्ष व रा.स.वि.नी. कर्ज २५% प्रमाणे रु. १३३.१५ लक्ष असे एकूण रु. ६८७.१५ लक्ष तद्नंतर वाचा क्र. ३ च्या शासन निर्णयान्वये प्रकल्प उभारणीसाठी अर्थसहाय्याच्या दुसऱ्या हप्त्यापोटी शासकीय भागभांडवल ५० % रु. ५५४.०० लक्ष व रा.स.वि.नी. कर्ज रु. ५८.७५ लक्ष असे एकूण रु. ६१२.७२ लक्ष प्रमाणे मंजूर करुन अदा करण्यात आले आहेत. संस्थेला पाहिल्या व दुसऱ्या हप्त्यापोटी शासकीय भांगभांडवल अनुक्रमे एकूण रु. ११०८.०० लाख व कर्ज एकूण रु. १९१.९० लाख, असे भागभांडवल व कर्ज मिळून आतापर्यंत एकूण १२९९.८७ लक्ष अदा करण्यात आले आहेत. राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांनी दिनांक १ एप्रिल, २०१४ च्या पत्रान्वये मंजूरी दिलेल्या प्रकल्पास आता, आयुक्त वस्त्रोद्योग, नागपुर यांनी दिनांक १९ मार्च, २०२५ च्या पत्रानव्ये सदर संस्थेस उर्वरित शासकीय कर्ज रु. ११९३.१० लक्ष देय असल्याचे कळविले आहे.

सदर संस्थेस राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांच्याकडून मंजूर प्रकल्प अहवालानुसार शासकीय भागभांडवल, शासकीय कर्ज व सभासद भागभांडवल यांचा आकृतीबंध खालीप्रमाणे आहे :-

**रु. लक्षामध्ये**

| अ.क्र. | तपशिल | टक्केवारी | जमा करावयाची रक्कम | प्रत्यक्षात जमा रक्कम | शिल्लक रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १ | सभासद भागभांडवल | १०% | २७७.०० | २७७.०० | ०० |
| २ | शासकीय भागभांडवल | ४०% | ११०८.०० | ११०८.०० | .०० |
| ३ | शासकीय कर्ज | ५०% | १३८५.०० | १९१.९० | ११९३.१० |
| **एकूण** | | **१००%** | **२७७०.००** | **१५७६.९** | **११९३.१०** |

संचालक, मेट्रो हायटेक को ऑप टेक्सटाईल पार्क लि., (गारमेंट मॅन्युफॅक्चरींग), इचलकरंजी, ता. हातकणंगले, जि. कोल्हापूर या संस्थेने दिनांक १५ मार्च, २०२५ रोजी रु. ५०.०० लक्ष इतकी रक्कम व्याजापोटी व दिनांक २४ मार्च, २०२५ रोजी व्याजापोटी रु. ४०.७९ लक्ष व दंडव्याजापोटी रु. १२.०४ लक्ष असे एकूण रु १०२.८३ लक्ष भरल्याचे प्रादेशिक उपआयुक्त, वस्त्रोद्योग, सोलापूर यांनी दिनांक २४ मार्च, २०२५ च्या पत्रान्वये कळविले आहे.

सदर संस्थेने वाचा क्र. २ व ३ येथील शासन निर्णयान्वये पहिल्या व दुसऱ्या हप्त्यापोटी वितरित केलेल्या रु. १२९९.९ लक्ष इतक्या अर्थसहाय्याच्या १०० % रक्कमेचा विनियोग केला आहे. त्यानुसार सदर संस्थेच्या प्रकल्प उभारणीकरीता दुसऱ्या हप्त्यापोटी कर्ज वितरित करण्यास मंजुरी देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

मेट्रो हायटेक को ऑप टेक्सटाईल पार्क लि., (गारमेंट मॅन्युफॅक्चरींग), इचलकरंजी, ता. हातकणंगले, जि. कोल्हापूर या संस्थेच्या प्रकल्पाची उभारणी करण्यासाठी दुसऱ्या हप्त्यापोटी (अंतिम

हप्ता) **शासकीय कर्जापोटी शिल्लक उर्वरित रु. १०६९.२० लक्ष ( अक्षरी- रुपये दहा कोटी एकोणसत्तर लाख वीस हजार फक्त)** इतकी रक्कम खालील अटींच्या अधीन राहुन मंजूर करण्यास या आदेशाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर संस्थेस रु. ४ कोटी इतक्या प्रकल्प किमतीच्या मर्यादेत किंवा सदर संस्थेला त्यांच्या सन २०१७ मध्ये निश्चित केलेल्या प्रकल्प किंमत यापैकी जी रक्कम कमी असेल ती प्रकल्प किंमत निश्चित करुन शासनाच्या नवीन योजनेतून मान्यता देण्याची तरतूद आहे. तथापि, सदर संस्थेच्या गारमेंट मॅन्युफॅक्चरींग प्रकल्पासाठी रु. २७७०.०० लक्ष (अक्षरी रुपये दोन हजार सातशे सत्तर लक्ष फक्त) इतक्या खर्चाच्या प्रकल्पास राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांनी दिनांक १ एप्रिल, २०१४ च्या पत्रान्वये मंजूरी दिलेली आहे.

३. याद्वारे वितरीत करण्यात येणाऱ्या रक्कमेचा योग्य विनियोग केल्यासंबंधीचे उपयोगिता प्रमाणपत्र संस्थेने, वस्त्रोद्योग आयुक्तालयामार्फत तीन महिन्याच्या आत शासनास सादर करावे, किंबहुना ही जबाबदारी संबंधित प्रादेशिक उपआयुक्त (वस्त्रोद्योग), सोलापूर यांची राहील.

४. या योजनेअंतर्गत वितरीत केल्या जाणाऱ्या कर्जावरील व्याज कर्ज दिल्याचे दिनांकानंतर त्या आर्थिक वर्षाचे अखेरपर्यत दिनांक ३१ मार्च पर्यंत देय असलेल्या व्याजाची शासनाने वेळोवेळी /प्रतिवर्षी मंजूर केलेल्या दरानुसार परिगणना करुन येणारी रक्कम दिनांक ३० सप्टेंबर पूर्वी भरणे संस्थेवर बंधनकारक आहे.

५. सदर संस्थेस शासनाने दिलेले अर्थसहाय्याची (शासकीय भागभांडवल, शासकीय कर्ज व कर्जावरील व्याज) त्यांना दुसरा/अंतिम हप्ता मिळाल्यानंतर ८ वर्षात व ८ समान हप्त्यात शासनास परतफेड करावी.

६. शासनामार्फत दिल्या गेलेल्या अर्थसहाय्याच्या आधारावर उभारण्यात आलेले प्रकल्प पूर्ण होऊन उत्पादनाखाली आल्यावर त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास सादर करून संबंधित संस्थेकडून येणे असलेल्या रक्कमेच्या वसुलीवर परिणामकारक, नियंत्रण ठेवता येणे सुलभ व्हावे म्हणून आयुक्त (वस्त्रोद्योग), नागपूर यांनी संबंधीत संस्थेच्या बाबतीत तिमाही विवरणपत्र विहित करून त्यावर नियंत्रण ठेवण्याचे काम करावे. तिमाही विवरणपत्रे शासनास सादर करण्यात यावीत.

७. भागभांडवलाची व कर्जाची व्याजासह संपुर्ण रक्कम वसूल करता येणे सुलभ व्हावे म्हणून या रक्कमाची परतफेड होईपर्यत संस्थेने सभासदांना ४% पेक्षा अधिक लाभांश देऊ नये.

८. शासकीय कर्जावरील व्याज दर ठरविण्याबाबत वित्त विभागातील अर्थबळ कार्यासनाचे निश्चित धोरण नसल्याने राज्य शासनामार्फत खुल्या बाजारातील उभारण्यात येणाच्या कर्जाच्या व्याज दराच्या मागील तीन वर्षांच्या बाजार कर्जावरील (SDL) व्याज याची सरासरी विचारात घेऊन येणारा व्याजाचा दर पूर्णाकित केल्यानंतर त्यामध्ये १% अतिरिक्त व्याज अंतर्भूत करून सन २०२३-२४ या वर्षामध्ये शासनामार्फत देण्यात येणाऱ्या कर्जासाठी व्याजाचा दर ८% निश्चित करण्यात आला आहे. त्याच प्रमाणे बाजारातील व्याज दराचा चढ-उतार लक्षात घेऊन यापुढेही प्रत्येक वर्षासाठी मागील तीन वर्षांच्या बाजार कर्जावरील (SDI) व्याज याची सरासरी विचारात घेऊन येणारा व्याजाचा दर पूर्णांकित केल्यानंतर त्यामध्ये

१% अतिरिक्त व्याज अंतर्भूत करून त्यानुसार येणारा व्याज दर निश्चित करुन शासन पत्राद्वारे प्रसिद्ध करण्यात येईल.

९. भागभांडवल, कर्ज व व्याजाची रक्कम भरण्यास कसूर केल्यास, संस्थेवर वार्षिक २.५% दराने दंडनीय व्याजाची रक्कम आकारण्यात येईल.

१० सदर योजनेंतर्गत मंजूर करण्यात येणाऱ्या भाग भांडवलाची कर्जाची व कर्जावरील व्याजाची वसुली करण्याची जबाबदारी आयुक्त (वस्त्रोद्योग), नागपूर व संबंधित प्रादेशिक उपआयुक्त, वस्त्रोद्योग यांची राहील. त्यांनी महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० अंतर्गत कलम १५५ अन्वये कार्यवाही करावी व वसूली प्रभावी रित्या पार पाडली जाईल या दृष्टीकोनातून त्यांनी योग्य ती उपाययोजना करावी. वसूल करण्यात आलेल्या तसेच वसुलीसाठी शिल्लक राहिलेल्या रकमेचा तपशील दरवर्षी ऑक्टोबर अखेरीस आयुक्त (वस्त्रोद्योग), नागपूर यांचे मार्फत शासनास पाठवावा.

११. संस्थेस देण्यात आलेल्या कर्ज व शासकीय भागभांडवल रक्कमेच्या २० टक्के इतकी संस्थेच्या संचालकांची स्व-मालमत्ता शासनाकडे तारण ठेवणे आवश्यक आहे. त्याबाबत संबंधीत प्रादेशिक उपआयुक्त, वस्त्रोद्योग यांनी महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या नावाने करारनामा करावा. जोपर्यंत असे तारण प्राप्त होत नाही तोपर्यंत संस्थेस मंजूर केलेल्या रक्कमेची संस्थेस उचल करता येणार नाही किंवा त्या रक्कमेवर संबंधित संस्थेस अधिकर्ष (Overdraft) काढून रक्कम खर्च करता येणार नाही. याबाबत संस्थेवर व बँकेवर आयुक्त (वस्त्रोद्योग), नागपूर यांनी बंधन आणावे.

१२. संस्थेच्या संचालक मंडळाची जेंव्हा जेंव्हा निवडणूक होईल तेंव्हा तेंव्हा नवीन संचालक मंडळास ३ महिन्यांच्या आत संस्थेस मंजूर करण्यात आलेल्या कर्ज व शासकीय भागभांडवलाच्या रक्कमेच्या २० टक्के स्व-मालमत्ता शासनाकडे तारण म्हणून ठेवावी लागेल तसेच नव्याने नियुक्त संचालक मंडळाने असे तारण दिल्यानंतर पुर्वीच्या संचालक मंडळास तारणमुक्त करता येईल, तसेच नव्याने नियुक्त संचालक मंडळाने वरीलप्रमाणे तारण दिल्यानंतरच नविन संचालक मंडळ अस्तित्वात येईल अशी सुधारणा संस्थेच्या Bye Laws मध्ये करण्याबाबत आयुक्त (वस्त्रोद्योग), नागपूर यांनी आवश्यक ती कार्यवाही करावी.

१३. शासनाकडून अर्थसहाय्य घेत असताना संस्थेचे संचालक व त्यांच्या कुंटूंबातील इतर व्यक्तीना त्यांची मालमत्ता इतर वित्तीय संस्थेकडे तारण म्हणून ठेवता येणार नाही. तसेच शासनाने दिलेल्या अर्थसहाय्याची पुर्ण परतफेड होत नाही तोपर्यंत या प्रकल्पासाठी तारण ठेवलेली मालमत्ता इतर कोणत्याही वित्तीय संस्थेकडे तारण ठेवु नये याबाबतचे प्रतिज्ञापत्र संबंधीत प्रादेशिक उपआयुक्त, वस्त्रोद्योग यांचेकडे सादर करावे.

१४. प्रकल्प उभारताना होणारा वाढीव खर्च संस्थेने त्यांच्या स्वनिधीतून करावा.

१५. सदर योजनेचा लाभ हा एका संस्थेतील संचालकांच्या कुटुंबातील एकापेक्षा जास्त सदस्यांना घेता येणार नाही. याबाबत आयुक्त (वस्त्रोद्योग) यांनी दक्षता घ्यावी.

१६. अस्तित्वातील संस्था असल्यास प्रकल्प अहवाल सादर करण्यापूर्वीच्या लगतच्या दोन वर्षातील ताळेबंद पत्रक आणि लेखाच्या सनदी लेखापालांच्या प्रमाणपत्र, सनदी लेखापाल यांनी तयार केलेला आणि प्रमाणित केलेला प्रकल्प अहवाल, संस्था खर्चीवाल्या भागधारकांची नवीन संस्था असल्यास, संस्थेच्या सभासदाकडे असलेल्या मागावरील कर्जाचा बोजा दर्शविणारे तसेच, माग सुस्थितीत आहेत, हे

पाहण्यासाठी मागील ३ वर्षात त्यावर काढलेल्या उत्पादनाची माहिती संस्थेने आयुक्तालयास सादर करणे आवश्यक आहे.

१७. बांधकाम व यंत्रसामुग्रीकरिता ई-टेंडरींग प्रक्रीयांचे अवलंबन करणे बंधनकारक राहील. तसेच विविध खरेदीच्या अनुषंगाने विहीत खरेदी पध्दतीचा अवलंब करणे बंधनकारक राहील व खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नांवे ECS व्दारे अदा करावी, याबाबतचे नियंत्रण आयुक्त (वस्त्रोद्योग), नागपूर यांनी ठेवावे.

१८. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/ प्र.क्र.४८/ अर्थ-३, दिनांक २४ जून, २०२१ सोबतच्या परिशिष्टातील अ.क्र. १,२,३,४,५,६,७, व ८ या प्रकरणी लागू नाहीत. यंत्रमाग सहकारी संस्थाना मंजूर करण्यात येणारे शासकीय भाग भांडवल व शासकीय कर्ज हे परिशिष्टातील अ.क्र.९ येथील अनुक्रमे "३२-अंशदाने " व "५५ कर्जे व अग्रिम" या बाबीखाली मंजूर करण्यात येते. परिशिष्टातील अ.क्र.९ येथील तपासणी सुचीमधील याप्रकरणी लागु असलेल्या मुद्द्यांची पुर्तता होत असल्याची खातरजमा करण्याची जबाबदारी आयुक्त वस्त्रोद्योग, नागपुर याची राहील.

१९. वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेल्या शासकीय भागभांडवल व कर्जाची रक्कम आहरीत करुन संस्थेस वितरीत करण्याकरीता आयुक्त (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर यांना नियंत्रक अधिकारी व सहाय्यक संचालक, लेखा, वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी या शासन निर्णयानुसार मंजूर करण्यात आलेल्या भाग भांडवल व कर्जाची रक्कम कोषागारातून काढून मेट्रो हायटेक को ऑप टेक्सटाईल पार्क लि., (गारमेंट मॅन्युफॅक्चरींग), इचलकरंजी, ता. हातकणंगले, जि. कोल्हापूर **या संस्थेचा कोल्हापुर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बॅक, शाखा इचलकरंजी (मुख्य) येथील खाते क्रमांक-031210001100444, IFSC Code- IBKL0463KDC, चालु खात्यावर RTGS व्दारे वितरीत करण्याची कार्यवाही करावी.** (याबाबत संस्थेच्या बँक खात्याची खात्री करुन निधी वितरीत करण्यात यावा.)

२०. यावर होणारा खर्च पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व चालू आर्थिक वर्षी सन २०२४-२५ करीता उपलब्ध असलेल्या अर्थसंकल्पिय तरतूदीतून भागविण्यांत यावा.

अ) शासकीय कर्ज रुपये १०६९.२० लक्ष (रु. **एक दहा कोटी एकोणसत्तर लाख वीस हजार फक्त** )

<u>मागणी क्रमांक व्ही - ५</u>
६८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग यासाठी कर्जे,
(००) (१०९), संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग सहकारी संस्था,
पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (राज्य योजनांतर्गत योजना)
(००) (२०) यंत्रमाग सहकारी संस्थांना कर्जे ( रा.स.वि.म.),
(६८५१ ०३५९) ५५, कर्जे व आगाऊ रकमा

२१. सदर शासन निर्णय वित्त विभाग परिपत्रक क्रमांक क्र. अर्थसं २०२४/ प्र.क्र. ८०/ अर्थ-३. दिनांक १७ मार्च, २०२५ अन्वये ५५ - कर्ज व आगाऊ रकमा या बाबींतर्गत प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारास तसेच, वित्त विभाग अनौ. संदर्भ क्र २५१९/२०२५, दिनांक २८.०३.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

२२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यांत आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२५०३२९१८१७०४१६०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

RAVINDRA NAMDEV PATIL

Digitally signed by RAVINDRA NAMDEV PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=CO-OPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=6086895df04b938ea57e5ae6b34823daabcdbb05119b0cab8aa75feb5283c773, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C69BF686C6E48D54399329327C672B8AFEC5ACC7354D86E6BEAAEDBC31024E4E, cn=RAVINDRA NAMDEV PATIL
Date: 2025.03.29 18:19:11 +05'30'

( रविंद्र पाटील )
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महालेखापाल, ( लेखापरीक्षा ) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२ नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२ नागपूर.
३. प्रधान सचिव (वस्त्रोद्योग), यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ३२.
४. उप सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. कार्यासन अधिकारी (रोख शाखा) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग. (३ प्रती)
६. आयुक्त (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर.
७. प्रादेशिक उपआयुक्त (वस्त्रोद्योग), औरंगाबाद.
८. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई./नागपुर
९. संचालक, लेखा व कोषागारे (संगणक विभाग), नविन प्रशासकीय भवन, मुंबई.
१०.सहसंचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
११.निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
१२.नियोजन विभाग (कार्या-१४३१), मंत्रालय, मुंबई ३२.
१३.वित्त विभाग (व्यय-२/अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, मुंबई.
१४.अवर सचिव (१७-स) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५.कक्ष अधिकारी (१६-स) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६.चेअरमन, मेट्रो हायटेक को ऑप टेक्सटाईल पार्क लि., (गारमेंट मॅन्युफॅक्चरींग), इचलकरंजी, ता. हातकणंगले, जि. कोल्हापूर
१७. निवड नस्ती (टेक्स-२).